राज्यात माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१९ मध्ये "क्यार" व "महा" चक्रिवादळामुळे झालेल्या अवेळी पावसामुळे शेतीपिकाच्या नुकसानीपोटी आपद्ग्रस्तांना विशेष दराने मदत देण्यासाठी निधी वितरित करण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय, क्रमांक :- पुरक २०१९/प्र.क्र.१९८/म-३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २९ जून, २०२०

वाचा : १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस -२०१५/प्र.क्र.४०/म-३,दि. १३.०५.२०१५
२) शासन निर्णय,महसूल व वन विभाग, क्र. सीएलएस -२०१९/प्र.क्र१९१/म-३,दि.१८.११.२०१९
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग,क्र. सीएलएस -२०१९/प्र.क्र१९१/म-३,दि.१३.१२.२०१९
४) शासन निर्णय, समक्रमांक, दि. ०१.०२.२०२०

प्रस्तावना:-

राज्यात माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१९ मध्ये "क्यार" व "महा" चक्रिवादळामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे झालेल्या अवेळी पावसामुळे राज्यातील ३४ जिल्ह्यातील ३४९ तालुक्यांमधील शेतीपिकांचे नुकसान झाल्याचे निदर्शनास आले आहे. सदर नैसर्गिक आपत्तीमुळे शेतीपिकांचे नुकसान झाल्याने बाधित झालेल्या शेतकऱ्यांना मदतीसाठी संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या दराने मदत देण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक २ , ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये एकूण रू ७३०९.३६ कोटी इतका निधी वितरित करण्यात आलेला आहे. विभागीय आयुक्त पुणे/औरंगाबाद/नागपूर /अमरावती यांचेकडून उपयोगिता प्रमाणपत्रे सादर करून उर्वरित बाधित शेतकऱ्यांना निधी वाटपासाठी अतिरिक्त निधीची मागणी करण्यात आली होती. या प्रयोजनासाठी उर्वरित बाधित शेतकऱ्यांना मदतीचे वाटप करण्यासाठी रू. ३२६२२.५० लक्ष (रूपये तीनशे सव्वीस कोटी बावीस लक्ष पन्नास हजार फक्त) इतका निधी वितरित करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

माहे ऑक्टोबर-नोव्हेंबर २०१९ मध्ये "क्यार" व "महा" चक्रिवादळामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीमुळे झालेल्या अवेळी पावसामुळे राज्यातील ३४ जिल्ह्यांतील ३४९ तालुक्यांमधील शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान झाले आहे. सदर आपत्तीमुळे शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान झालेल्या आपद्ग्रस्त शेतकऱ्यांना पुढीलप्रमाणे विशेष दराने मदत देण्याचा निर्णय शासनाने संदर्भाधीन क्रमांक २ येथील

शासन निर्णयान्वये घेतला आहे:

(अ) मदत - शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे नुकसान

| बाब | आर्थिक सहाय्याचे दर |
|---|---|
| अ) शेतीपिके | रु.८,०००/- प्रति हे. |
| ब) बहुवार्षिक पिके (फळबागा) | रु.१८,०००/- प्रति हे. |

शेतीपिके/ फळपिकांच्या नुकसानीसाठी २ हेक्टरच्या मर्यादेपर्यंत उपरोक्त मदत अनुज्ञेय राहील.

२. उपरोक्त दरानुसार उर्वरित बाधित शेतकऱ्यांना मदतीचे वाटप करण्यासाठी रू. ३२६२२.५० लक्ष (रूपये तीनशे सव्वीस कोटी बावीस लक्ष पन्नास हजार फक्त) इतका निधी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे जिल्हयांना विभागीय आयुक्तांमार्फत वितरित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. शेती व बहुवार्षिक पिकाच्या नुकसानीसाठी मदतीचे वाटप करताना खालीलप्रमाणे दक्षता घेण्यात यावी.

i) प्रचलित नियमानुसार शेती / बहुवार्षिक पिकाच्या नुकसानीकरीता मदत ३३ टक्के अथवा त्याहून अधिक नुकसान झालेल्यांना अनुज्ञेय राहील.

ii) प्रचलित पध्दतीनुसार कृषी सहायक, तलाठी व ग्राम सेवक यांच्या संयुक्त स्वाक्षरीने पूर्ण करण्यात आलेल्या पंचनाम्यानुसार सर्व जिल्हाधिकारी यांनी दिलेल्या अहवालानुसार विभागीय आयुक्त यांनी शासनास सादर करण्यात आलेल्या अहवालानुसार मदतीचे वाटप जिल्हाधिकारी यांनी करावे.

iii) **शेतीपिकांच्या नुकसानीसाठी मदतीची किमान रक्कम रू १०००/- तसेच बहुवार्षिक पिकांसाठी मदतीची किमान रक्कम रू २०००/- अनुज्ञेय राहील.**

iv) संबंधित बाधितांच्या बँक बचत खात्यात मदतीची रक्कम थेट जमा करण्यात यावी.

v) कोणत्याही बाधितांना रोखीने किंवा निविष्ठा स्वरुपात मदत करण्यात येऊ नये

vi) शेत जमिनीच्या झालेल्या नुकसानीकरीता मदतीची रक्कम खातेदारांच्या बँक खात्यावर थेट जमा करताना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करु नये. याकरिता सहकार विभागाने योग्य ते आदेश निर्गमित करावेत.

vii) सदर निर्णयान्वये शेतकऱ्यांना देण्यात येणारी मदत ही विशेष बाब असल्यामुळे पूर्वोदाहरण म्हणून गणली जाणार नाही.

४. या प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशीर्ष २२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य, ०२, पूर, चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०५) नैसर्गिक आपत्तीमुळे पीक नुकसानीकरिता शेतकऱ्यांना मदत, ३१ सहाय्यक अनुदाने ( २२४५ २४५२) या लेखाशीर्षाखाली चालू वर्षी करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून खर्ची

टाकण्यात यावा. सदर निधी विभागीय आयुक्त यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरित करण्याची कार्यवाही कार्यासन म-११, मदत व पुनर्वसन प्रभाग यांनी करावी.

५. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: ११९/२०२०/व्यय-९, दिनांक २५.०६.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००६२९१५३७०५३९१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

(सुभाष उमराणीकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. अप्पर मुख्य सचिव (वित्त),मंत्रालय,मुंबई ,
३. विभागीय आयुक्त (सर्व)
४. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
५. जिल्हाधिकारी (सर्व)
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. महालेखापाल (लेखा परीक्षण), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
८. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१०. सह सचिव (कार्यासन म-११), मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय,मुंबई यांना बीम्स प्रणालीवर निधी वितरित करण्याच्या विनंतीसह अग्रेषित
११. कार्यासन अधिकारी , कार्यासन( अर्थसंकल्प-६/व्यय-९) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१२. कार्यासन अधिकारी, कार्यासन (१०-अे/१३-अे), कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवडनस्ती म-३ कार्यासन

**शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक : पुरक - २०१९/प्र.क्र.१९८/म-३ , दिनांक : २९ जून, २०२० चे विवरणपत्र**

| अ.क्र. | जिल्हा | या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत असलेला निधी (रू लाखात) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १. | सातारा | १३५.३८ |
| २. | कोल्हापूर | १८.६१ |
| **पुणे विभाग** | | **१५३.९९** |
| ३. | औरंगाबाद | २२९.०० |
| ४. | जालना | ३१९७.९० |
| ५. | बीड | ७१८८.९८ |
| ६. | लातूर | २४४९.२६ |
| ७. | उस्मानाबाद | ७७१.९८ |
| ८. | नांदेड | ५०६५.४९ |
| ९. | परभणी | ३९५९.०४ |
| १०. | हिंगोली | २०७५.३० |
| **औरंगाबाद विभाग** | | **२४९३६.९५** |
| ११. | बुलढाणा | २१४.६३ |
| १२. | अकोला | ९८९.२४ |
| १३. | वाशिम | १३६७.८५ |
| १४. | अमरावती | ११०८.८२ |
| १५. | यवतमाळ | ३३२७.७० |
| **अमरावती विभाग** | | **७००८.२४** |
| १६. | नागपूर | ४३०.०४ |
| १७. | गडचिरोली | ९३.२८ |
| **नागपूर विभाग** | | **५२३.३२** |
| **एकूण** | | **३२६२२.५०** |